**दि.३ ऑक्टोबर, २०२१ रोजी भंडारा जिल्हयातील मोहाडी व तुमसर तालुक्यात आलेल्या चक्रीवादळामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना मदत देण्याबाबत (विभागीय आयुक्त, नागपूर) ....**

**महाराष्ट्र शासन**

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२१/प्र.क्र.३४८/म-३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : २४ जानेवारी, २०२२

वाचा : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म -३, दिनांक १३.०५.२०१५

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/ म-३ , दिनांक ०६.१०.२०२१

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक:- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२४२/ म-३, दिनांक २१.१०.२०२१

४) विभागीय आयुक्त, नागपुर यांचे पत्र क्रमांक :-मशा-७(५)/नै.आ.व्य./कावि-६१२/२०२१, दिनांक ११.११.२०२१

प्रस्तावना:

दि.०३ ऑक्टोबर, २०२१ रोजी भंडारा जिल्हयातील मोहाडी व तुमसर तालुक्यात चक्रीवादळामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या (SDRF) दराने व वाढीव दराने मदत देण्यासाठी आवश्यक असलेले निधी मागणीचा प्रस्ताव विभागीय आयुक्त, नागपूर यांच्याकडून प्राप्त झाला आहे. त्यानुसार बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

दि.०३ ऑक्टोबर, २०२१ रोजी भंडारा जिल्हयातील मोहाडी व तुमसर तालुक्यात चक्रीवादळामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी बाधित शेतकऱ्यांना मदत देण्याकरिता राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या वाढीव दरानुसार **रु ९९.०० लाख (अक्षरी रुपये नव्यान्नव लक्ष फक्त)** इतका निधी खालील तक्त्या दर्शविल्यानुसार विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत जिल्हाधिकारी, भंडारा यांना वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | शेतकरी संख्या | आश्वासित सिंचनाखालील क्षेत्र | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | शेतकरी संख्या | बाधित क्षेत्र | आवश्यक मदत (रुपये लाखात) | |
| | | | | | SDRF च्या दराने मदत देण्यासाठी अनुदान (२२४५ २४५२) | वाढीव दराने मदत देण्यासाठी अनुदान (२२४५ २३०९) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | भंडारा | १६३० | १६३० | ६६० | ८९.१० | ९.९० |
| | **एकुण नागपुर** | **१६३०** | **१६३०** | **६६०** | **८९.१०** | **९.९०** |

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्राप्रमाणे लेखाशीर्षनिहाय निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक ०२.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मदतीचे वाढीव दर मंजूर करण्यात आले आहेत. त्या वाढीव दरापैकी **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या (SDRF) संदर्भाधीन क्रमांक १ व ३ येथील शासन निर्णयातील दराने** मदत प्रदान करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा आणि **वाढीव मंजूर दर वजा राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे दर यातील फरकाच्या मदतीची रक्कम** राज्य शासनाच्या निधीमधुन वितरित करण्यात आलेला निधीतून भागविण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

४. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. या शासन निर्णयान्वये संपूर्ण रक्कम बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत असली तरी, लाभार्थी निश्चित झाल्यानंतर वित्तिय शिस्तीच्या दृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रत्यक्ष गरजेनुसारच कोषागारातून रक्कम आहरित करून त्यानंतरच रक्कम लाभार्थ्यांच्या थेट बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने हस्तातंरित करण्याबाबत दक्षता घ्यावी. सदर निधी अनावश्यकरित्या कोषागारातून आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**. या सर्व सुचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता

प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या महालेखापाल यांना तसेच शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध केलेल्या निधीमधून उपलब्ध करून देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- १४/२०२२/व्यय-९, दिनांक १२.०१.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०१२४१२१२३१७२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.01.24 12:13:54 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
३. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. विभागीय आयुक्त नागपूर ,
७. जिल्हाधिकारी भंडारा,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१०. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा ,
१२. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१३. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१४. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१५. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१७. निवड नस्ती (कार्यासन/ म-३).